**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सहाय्यकृत बाबी या घटकाकरिता पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेस अनुदान वितरीत करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
### पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र.४४/पापु-१९

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २१ मार्च, २०१७

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४
५) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
६) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०१५
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १० मार्च, २०१५
९) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
१०) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
११) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११५/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६
१२) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.०१/पापु-१९, दिनांक १९ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण पाणीपुरवठा क्षेत्रात सुधारणा करण्याच्या उद्देशाने व ग्रामीण जनतेस स्वच्छ आणि पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन क्र.१० येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ ते २०१९-२० या चार वर्षाच्या कालावधीत राज्यात मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर कार्यक्रमाचे संनियंत्रण, पर्यवेक्षण व समन्वयन संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापुर, नवी मुंबई

यांच्यामार्फत करावयाचे आहे. त्याकरिता पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था स्तरावर ग्रामीण पाणी पुरवठा सनियंत्रण व व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात येणार आहे.

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांची देखभाल दुरुस्ती (२२१५ ९९६२) या लेखाशिर्षातंर्गत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या रु.८० कोटी एवढ्या अनुदानातून रु.२५ कोटी एवढे अनुदान सहाय्यकृत बाबी या घटकाकरिता पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेस मुक्त व वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांची देखभाल दुरुस्ती (२२१५ ९९६२) या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या रु.८० कोटी एवढ्या रकमेतुन रु.२५ कोटी (अक्षरी रुपये पंचवीस कोटी फ़क्त) इतकी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी (रोखशाखा), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा) (श्री.का.जा.धलपे), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उपसचिव (श्री. म. भ. सावंत), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा) यांनी अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरित करुन ती पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी व तद्नंतर स्वतंत्र ECS द्वारे सदर रक्कम पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी. पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर यांनी सदर रक्कम मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमाशी संबंधित खालील बाबींबर खर्च करावी.

१. वासो स्तरावर मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या सनियंत्रणाकरिता स्थापन करण्यात येणा-या कक्षातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते.
२. संगणकीकरण व माहिती व्यवस्थापन प्रणालीचा विकास.
३. मनुष्यबळ विकासासाठी क्षमता बांधणी आणि त्याकरिता आवश्यक प्रशिक्षणे, क्षेत्रभेटी, कार्यशाळा इ.
४. MRDWP कार्यक्रमांतर्गत समाविष्ट गावांमध्ये माहिती-शिक्षण-संवाद उपक्रम राबविणे.
५. संशोधन व विकास प्रकल्प राबविणे.
६. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमाशी संबंधित इतर अनुषंगिक बाबी.

३. या वितरीत केलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणीपुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२८) प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांची देखभाल दुरुस्ती (२२१५ ९९६२)-३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग , शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०१६ च्या परिपत्रकामधील परिच्छेद ७ ते१८ मधील अटी तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील बाबींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२११६२१३४०२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2017.03.21 18:59:24 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
५) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
८) आहरण संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती (पापु-१९)